**मौजे पैठण (ता.पैठण, जि.औरंगाबाद) येथे पूरग्रस्तांचे पुनर्वसनासाठी संपादन केलेल्या जमिनीचा मोबदला अदा करणेबाबत...**

महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एफएलडी-२०१६/प्र.क्र.१५७/र-१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १८/०९/२०१८

वाचा -

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक-गावठाण-४६११/प्र.क्र.१०३/र-१२, दि.१८.१.२०१३
२) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक-बीयूडी-२०१८/प्र.क्र.६७/ब-१, दि.९.३.२०१८
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक- पूरक-२०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दि.२७.७.२०१८
४) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्रमांक-पुरवणी-२०१८/प्र.क्र.१७४/ब-१,दि.३१.७.२०१८
५) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०१६/पुनर्वसन/कक्ष-१/कावि-२१, दि.१०.११.२०१७
६) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र.२०१६/पुनर्वसन/कक्ष-१/कावि-२१, दि.२६.४.२०१८

प्रस्तावना -

मौजे पैठण (ता.पैठण, जि.औरंगाबाद) येथील सर्वे नं.६, क्षेत्र २.०० हेक्टर व सर्वे नं.७, क्षेत्र ४.०० हेक्टर एकूण ६ हेक्टर जमीन पूरगस्तांचे पुनर्वसनासाठी एलएआर नं.४८५/९९ व एलएआर नं.४८७/९९ नुसार भूसंपादन अधिकाऱ्यांनी दि.२०.२.१९९७ रोजी अंतिम निवाडा घोषित केला होता. भूधारकांनी त्याविरुध्द मा.दिवाणी न्यायालयात प्रकरण दाखल केले होते. मा.दिवाणी न्यायालयाने दि.३०.११.२००१ रोजी संबंधितांना वाढीव मोबदला अदा करण्याचे आदेश दिले. सदर मा.दिवाणी न्यायालयाच्या आदेशाविरुध्द शासनाने मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे अपील क्र.७२३/२००३ व अपील क्र.७३९/२००३ अन्वये अपील दाखल करण्यात आले होते. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांनी दि.१२.७.२०१३ रोजी अपील खारीज केले आहे. त्यानुषंगाने भूधारकांना अंतिम मोबदला देण्यासाठी, विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी केलेल्या मागणीस अनुसरुन निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

**मौजे पैठण (ता.पैठण, जि.औरंगाबाद) येथील सर्वे नं.६, क्षेत्र २.०० हेक्टर व सर्वे नं.७, क्षेत्र ४.०० हेक्टर एकूण ६ हेक्टर जमीन पूरगस्तांचे पुनर्वसनासाठी एलएआर नं.४८५/९९ व एलएआर नं.४८७/९९ प्रकरणी भूसंपादन अधिनियम, १८९४ मधील कलम-१८ नुसार जमीन मालकास भूसंपादनाचा अंतिम मोबदला अदा करण्यासाठी, रुपये १,५७,११,०००/- (रुपये एक कोटी सत्तावन्न लक्ष अकरा हजार फक्त) निधी मंजूर करण्यात येत आहे.**

२. सदर भूसंपादनाचा अंतिम मोबदला "मागणी क्रमांक सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०२-पूर, चक्रीवादळे, इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९३) पुरामुळे बाधित झालेल्या व्यक्तींच्या पुनर्वसनाकरिता रस्ते व घरे इ.बांधकामासाठी संपादन केलेल्या/ अधिग्रहित केलेल्या

जमिनीबद्दल नुकसानभरपाई देणे (अनिवार्य) (२२४५ ०१८२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांना उपलब्ध करुन दिलेला निधी संबंधित भूधारकांना तातडीने अदा करावा. तद्नंतर वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय व शासनास तातडीने सादर करावीत.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३१०/२०१८/व्यय-९, दि.२७.८.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१८१३०३५२५७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2018.09.18 13:08:54 +05'30'

**(द.शं.मुंजाळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२. जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२
४. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२
५. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
६. वित्तीय सल्लागार व सह सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. महसूल व वन विभाग, कार्यासन म-११/ आव्यप्र-२/ आव्यप्र-६/ब-१/पीएसी/पीएसी-१, मंत्रालय, मुंबई ३२.
८. निवडनस्ती कार्यासन र-१२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * * * *